विधि व न्याय विभागांतर्गत राबविल्या जाणाऱ्या केंद्र पुरस्कृत योजनांचा निधी PFMS प्रणालीद्वारे वितरीत करण्याकरीता सिंगल नोडल एजन्सी (SNA) व अंमलबजावणी यंत्रणा (IA) यांची नियुक्ती करणे व त्यांची राष्ट्रीयकृत बँकेत खाती उघडण्यास मंजूरी देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

## शासन निर्णय क्रमांक केंपुयो-३६२१/प्र.क्र.५५/का-१३

मंत्रालय, मुंबई ४०००३२

दिनांक:- १६ नोव्हेंबर २०२१

<u>वाचा</u> :- १) भारत सरकार, व वित्त मंत्रालय यांचे कायालयीन ज्ञापन क्र.F.No.१(१२/PFMS/FCD/२०२०, दिनांक २३ मार्च,२०२१

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२१२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४ दिनांक १ जुलै १०२१

३) विधि व न्याय विभाग, कार्यालयीन आदेश क्र. केंपुयो-३६२१/प्र.क्र.५५/का-१३ दिनांक २६ जुलै २०२१

<u>प्रस्तावना :-</u>

केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करणे तसेच निधी विनियोगाच्या प्रक्रियेत अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने संदर्भ क्र.१ येथील दिनांक २३ मार्च, २०२१ रोजीच्या आदेशान्वये केंद्र पुरस्कृत योजनांचा निधी Public Finance Management System द्वारे वितरीत करण्याच्या अनुषंगाने सुधारीत कार्यपद्धतीचा अवलंब करण्याचे निर्देश दिलेले आहेत. त्यास अनुसरुन वित्त विभागाने संदर्भ क्र.२ येथील शासन परिपत्रकान्वये केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधी वितरणासाठी Public Finance Management System चा वापर करण्याच्या अनुषंगाने सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार विधि व न्याय विभागांतर्गतच्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी संदर्भ क्र.३ येथील कार्यालयीन आदेशान्वये नोडल अधिकारी व प्रत्येक केंद्र पुरस्कृत योजनेकरीता Single Nodal Agency (SNA) ची नेमणूक करण्यात आली आहे. सदर सिंगल नोडल एजन्सी (SNA) व अंमलबजावणी यंत्रणा (IA) यांची राष्ट्रीयकृत बँकेत खाती उघडणे तसेच नोडल अधिकारी व सिंगल नोडल एजन्सी (SNA) यांच्या नियुक्तीच्या अनुषंगाने सर्वसमावेशक शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विधि व न्याय विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या खालील केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधि वितरणासाठी सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) कार्यान्वीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

1) Infrastructure Facilities for Judiciary
2) Gramnyayalaya
3) Setting up Fast Tract Court for Women and Children under National Mission for Safety of Women

२. विधि व न्याय विभागांर्गतच्या उपरोक्त नमूद केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधी वितरणासाठी स्टेट बँक ऑफ इंडिया या राष्ट्रीयकृत बँकेत खाली नमूद केल्याप्रमाणे Single Nodal Agency (SNA) यांची एकूण ३ Single Nodal Account व आवश्यकतेनुसार अंमलबजावणी यंत्रणा (IA) यांचेकरीता Subsidiary Zero Balance Account उघडण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

**अ)** Infrastructure Facilities for Judiciary

१. **Single Nodal Agency (SNA):-** कार्यासन अधिकारी (का-१३), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

२. **योजना अंमलबजावणी यंत्रणा** Implementing Agency (IA) :-

१. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग , सर्व जिल्हे

**ब)** Gramnyayalaya

१. **Single Nodal Agency (SNA):-** कार्यासन अधिकारी (का-१२), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

२. **योजना अंमलबजावणी यंत्रणा** Implementing Agencies (IA) :-

१.मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, संबंधित जिल्हे
२.मा.जिल्हा व सत्र न्यायाधीश, संबंधित जिल्हे
३.मा.दिवाणी न्यायाधीश (व.स्त.) संबंधित जिल्हे
४.मा.दिवाणी न्यायाधीश (क.स्त) व न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग, संबंधित जिल्हे
५.मा.न्यायाधिकारी, ग्राम न्यायालय, संबंधित जिल्हे

क) Establishment of Special courts for fast disposal of cases related to women and children under National Mission for Safety for Women

१. **Single Nodal Agency (SNA):-** कार्यासन अधिकारी (का-९), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

२. **योजना अंमलबजावणी यंत्रणा** Implementing Agencies (IA) :-

१. मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई
२. मा. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, संबंधित जिल्हे
३. मा.अतिरिक्त जिल्हा व सत्र न्यायाधिश, संबंधित जिल्हे

४. मा. जिल्हा व सत्र न्यायाधिश, संबंधित जिल्हे
५. मा. जिल्हा न्यायाधिश व सह जिल्हा न्यायाधिश संबंधित जिल्हे

३. केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधी वितरणासाठी सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) कार्यान्वीत करणे व त्याचा वापर करणेसाठी खालील प्रमाणे प्राधिकारी घोषित करण्यात येत आहेत:-

**अ) नोडल अधिकारी:-** PFMS कार्यान्वयनाकरीता राज्यस्तरावर सहसचिव / उपसचिव (का-१३) हे विधि व न्याय विभागाच्या केंद्र पुरस्कृत योजनांचे नोडल अधिकारी असतील व केंद्रपुरस्कृत योजनांकरिता सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) च्या समन्वयाचे काम पाहतील.

**ब) Single Nodal Agency:-** PFMS कार्यान्वयनाकरीता योजना राबविणारे कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग हे केंद्र पुरस्कृत योजनांचे Single Nodal Agency असतील.

**क) चेकर व मेकर :-** विधि व न्याय विभागाच्या योजना राबविणाऱ्या क्षेत्रिय कार्यालयातील लेखा विभागाचे कामकाज पाहणारे अधिकारी / कर्मचारी हे मेकर म्हणून जबाबदारी पार पाडतील. तसेच कार्यालय प्रमुख हे चेकर म्हणून काम पाहतील.

**३.** केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन बाबत वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ येथील परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

**४.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १६७/२१/को.प्र.५. दिनांक १८/८/२०२१ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११११६१०४४४३५२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने**

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2021.11.16 10:48:52 +05'30'

**( नितिन वि. जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रत:-**

१. मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई

२. मा.प्रबंधक (निरीक्षणे-२), मा.उच्च न्यायालय, मुंबई
३. मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, सर्व जिल्हे
४. महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई व नागपूर
५. मा.अतिरिक्त जिल्हा व सत्र न्यायाधीश, सर्व जिल्हे
६. मा.जिल्हा व सत्र न्यायाधीश, संबंधित जिल्हे
७. मा. जिल्हा न्यायाधिश व सह जिल्हा न्यायाधिश संबंधित जिल्हे
८. मा. दिवाणी न्यायाधीश (व.स्त.) संबंधित जिल्हे
९. मा. दिवाणी न्यायाधीश (क.स्त) व न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग, संबंधित जिल्हे
१०.मा.न्यायाधिकारी, ग्राम न्यायालय, संबंधित जिल्हे
११.सह/उप सचिव (का-९,१२,१३), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सर्व जिल्हे.
१४.कक्ष अधिकारी (व्यय-५, अर्थसंकल्प, कोषा प्रशा-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.कार्यासन अधिकारी, ९/ १२ /१३/ २३, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.